नाशिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१५६/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ३१ ऑक्टोबर, २०१८

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.का-५/साबांप्राविना/प्रआ/रस्ते दर्जोन्नत/ता.निफाड/६१७७/२०१८ दि. २८/०९/२०१८.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधिन पत्रान्वये नाशिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्ते निफाड तालुक्यातील मोठ्या भागातील शेतमाल बाजारपेठेपर्यंत पोहचविण्या करीता उपयोगी आहेत. या रस्त्यावरील गावांसाठी दळणवळणाच्या दृष्टीने महत्त्वाचे असून राज्यमार्ग व राष्ट्रीय महामार्ग यांना जोडणारे महत्त्वाचे रस्ते आहेत. सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, नाशिक यांचा ठराव विचारात घेऊन नाशिक जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रमुख जिल्हा मार्ग-६९ ते म्हरळगोई - विंचूर - सुभाषनगर - सोनवाडी खु. कोळवाडी ते निफाड प्रमुख राज्य मार्ग-४४ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १८३ | (०/०० ते २/५००) २.५०० कि.मी. | २०.१०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२४ |
| | | इतर जिल्हा मार्ग ८९ | (०/०० ते ११/६००) ११.६०० कि.मी. | | |
| | | इतर जिल्हा मार्ग ३१ | (१२/०० ते १८/००) ६.०० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | प्रमुख राज्य मार्ग-२ नैताळे ते (राज्यमार्ग-२७) दिंडोरी - खानगांवथडी - तारूलखेडले - तामसवाडी - झुंगे - खेडलेझुंगे - कोळगांव - रूई - धानोरे - डोंगरगांव - विंचूर - विठ्ठलवाडी - कोटमगांव - राज्यमार्ग-२७ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १८२ | (०/०० ते १६/३००) १६.३०० कि.मी. | ४०.३०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२५ |
| | | इतर जिल्हा मार्ग ३२ | (२१/०० ते २३/३०) २.३००कि.मी. | | |
| | | इतर जिल्हा मार्ग १७९ | (०/०० ते २१/७०) २१.७००कि.मी. | | |
| ३. | शिवडी - सोनवाडी - नैताळे - धारणगांव - खडक - रुई - देवगांव ते राज्यमार्ग-७ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १८० | (०/०० ते २७/४०) २७.४०० कि.मी. | २७.४०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२६ |
| ४. | प्रमुख जिल्हा मार्ग- ६९ पाचोरे खु. म्हरळगोई - वाहेगांव - नांदगांव - धरणगांव - गाजरवाडी - राज्यमार्ग-२७ ला मिळणारा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- १८३ | (२/५० ते १२/८०) १०.३०० कि.मी. | २६.२०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१२७ |
| | | इतर जिल्हा मार्ग- १३१ | (०/०० ते १५/९००) १५.९०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **११४.०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नाशिक जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **११४.०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (३०५०.३१० + ११४.००) म्हणजेच **३१६४.३१० कि.मी.** इतकी व **इतर जिल्हा मार्ग** दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **११४.०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (२९८८.२८० - ११४.००) म्हणजेच **२८७४.२८० कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३११२००४७०११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2018.10.31 12:06:36 +05'30'

**(स्वरूप रायपुरे)**

उपअभियंता तथा कार्यासन अधिकारी,

महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,नाशिक.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.